मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांना “एक्स” (ट्विटर) प्लॅटफॉर्मवर “Ports Department Mantralay GoM ( @Ports__Dept__GoM)” या नावाने अकाऊंट उघडण्यास मान्यता देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक मसामं-०१२५/प्र.क्र.४/बंदरे-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक ०५ मार्च, २०२५

वाचा :

१. शासन निर्णय क्रमांक धोरण-१२२१/प्र.क्र.५८/बंदरे-१, दिनांक १८.०८.२०२३.
२. वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.मसामं/आयटी /२०२४/२५/१२९, दिनांक ०७.०१.२०२५.

प्रस्तावना :

महाराष्ट्र राज्याला ७२० कि.मी. लांबीची किनारपट्टी लाभली असून त्यावर २ मोठी बंदरे व ४८ लहान बंदरे आहेत. महाराष्ट्राची किनारपट्टी भारतातील दुसऱ्या क्रमांकाची सर्वात लांब किनारपट्टी आहे. त्यामुळे राज्याच्या सागरी क्षेत्राचा विकास करण्यास प्रचंड वाव आहे. बंदर क्षेत्राच्या विकास व नियमनाकरीता राज्य शासनाने सातत्याने प्रयत्न केले आहेत. किनारपट्टीवरील लहान बंदरांचे नियंत्रण, विकास व नियमन याकरिता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड धोरण, १९९६ अन्वये महाराष्ट्र सागरी मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. तद्नंतर राज्याचे सागरी विकास धोरण टप्प्याटप्याने विकसित होत गेले आहे. सागरी विकास धोरणाच्या अंमलबजावणीमध्ये येणा-या अडचणींचा विचार करून मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने दिनांक १८.०८.२०२३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सागरी विकास धोरण -२०२३ ठरविण्यात आले आहे.

त्यानुसार महाराष्ट्र सागरी विकास धोरण -२०२३ मधील ध्येय व उद्दिष्टे खालीलप्रमाणे आहेत : -

१. सागरी व्यापार व पोत परिवहन उद्योगात शाश्वत वाढ करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्राच्या सागर किनाऱ्यांच्या सुप्त क्षमतांचा अधिकाधिक उपयोग करणे.
२. महाराष्ट्राच्या किनारपट्टीचा एकात्मिक आणि शाश्वत विकास करण्यासाठी समुदाय आणि हितसंबंधी यांच्या सहकार्याने धोरणात्मक आराखडा विकसित करणे.

३. महाराष्ट्राच्या औद्योगिक आणि सामाजिक विकासासाठी समान, जबाबदार आणि पर्यावरण स्नेही पद्धतीने उद्यमशील सहभागाला आकर्षित करणे.
४. सागरी व्यापाराकरिता महाराष्ट्र उद्योजकांसाठी प्रथम पसंतीचे ठिकाण बनवणे.
५. सर्व हितसंबंधी यांना अधिकाधिक लाभ मिळवून देणारी पूरक धोरणे निश्चित करुन, त्यांना सहाय्य करणे.
६. गुंतवणूकदारांना उद्योगासाठी हितावह वातावरण उपलब्ध करुन देणे.
७. विस्तृत कक्षा असलेल्या सागरी कामांना उत्तेजन देऊन त्याद्वारे सागर किनाऱ्यांचा वापर करण्याच्या बहुविध मार्गांचा शोध घेणे.
८. किनाऱ्यावर आणि समुद्रात बंदरे,गोदी,जहाज दुरुस्ती सुविधा, तत्संबंधी मोठी बांधकामे,बंदर आधारित उद्योग,आंतरराष्ट्रीय व्यापार आणि औद्योगिक विकास सेवा निर्माण करणे. यासाठी आवश्यक त्या सागरी पायाभूत सुविधा, मालवाहतूक मार्गिका, आंतरदेशीय जलमार्ग आणि संबंधित सुविधा निर्माण करणे.

विभागाचे उपरोक्त ध्येय व उद्दिष्ट्ये परिणामकाररित्या साध्य करण्यासाठी “बंदरे” विषयी उपयुक्त उपक्रमांना योग्य प्रसिध्दी देवून जनसामान्यांपर्यंत पोहोचविण्यासाठी समाज माध्यमांचा चांगल्या प्रकारे उपयोग करता येईल तसेच वेळोवळी येणारे शासन निर्णय व परिपत्रके यांना प्रसिध्दी देण्यासाठी Twitter अकाऊंट सुरु करणे उपयुक्त ठरेल.

वरील सर्व बाबींचा विचार करुन, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांच्या स्तरावर बंदरे उपविभागाचे ट्विटर अकाऊंट सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र सागरी मंडळाचे ध्येय व उद्दिष्ट्ये लक्षात घेता, मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांना त्यांच्या स्तरावर “एक्स” (ट्विटर) प्लॅटफॉर्मवर “Ports Department Mantralay a GoM ( @Ports_Dept_GoM)” या नावाने अकाऊंट सुरु करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर बाबी करीता कोणत्याही प्रकारचा निधी दिला जाणार नाही.
२. बंदरे विषयी माहिती अपलोड करणे व संनियंत्रण याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांची राहील.
३. ट्विटर अकाऊंट नियमाप्रमाणे हाताळणे व अद्ययावत करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांची राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०५१२३३५१०९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARAT RAMCHANDRA LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2025.03.05 12:35:36 +05'30'

**(भरत लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मंत्री, मत्स्यव्यवसाय व बंदरे यांचे खाजगी सचिव
२. अ.मु.स. (परिवहन व बंदरे), यांचे स्वीय सहायक
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई.
४. निवडनस्ती, कार्यासन बंदरे-१